नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेच्या स्थायी समितीने संमत केलेला ठराव क्र. १२७ दि. ३०.१.२०१९ अंतिमत: विखंडीत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: नामपा-२०१९/प्र.क्र.१०६/नवि-२४,**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक:- ३१ जानेवारी, २०२२

संदर्भ :- १) शासन निर्णय समक्रमांक दि.३०.८.२०१९
२) श्री. संभाजी कास्टेवाड, कार्यालया अधिक्षक यांचे दि.२०.९.२०१९ रोजीचे निवेदन
३) आयुक्त, नांदेड वाघाळा महागनरपालिका यांचे पत्र क्र. नावाशमनपा/साप्रवि/ आस्था ४/२३८/२०२१ दि.९.४.२०२१

प्रस्तावना : -

श्री. संभाजी माधवराव कास्टेवाड,जकात अधिक्षक, नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका यांना नोट बंदीच्या काळात वसुली कामात निष्काळजीपणा,कर वसूली बैठकींना उपस्थित न राहणे, तसेच उपस्थिती पटावर स्वाक्षरी करुन कार्यालयात अनुपस्थित राहणे इ. कारणांमुळे दि.१४.११.२०१६ रोजीच्या आदेशान्वये महानगरपालिकेच्या सेवेतून निलंबित करण्यात आले. तद्नंतर, श्री. कास्टेवाड यांना त्यांच्याविरुध्द सुरु केलेल्या विभागीय चौकशीच्या अधीन राहुन त्यांना महानगरपालिकेच्या सेवेत दि.८.३.२०१७ च्या आदेशान्वये पुन:स्थापित करण्यात आले.

२. श्री. कास्टेवाड यांच्याविरुध्द सुरु असलेल्या विभागीय चौकशीमध्ये चौकशी अधिकारी यांनी महानगरपालिकेस दि.२६.४.२०१८ रोजी चौकशी अहवाल सादर केलेला आहे. सदर चौकशी अहवालानुसार श्री. कास्टेवाड यांच्यावर ठेवण्यात आलेला दोषारोप क्र.१ अंशत: सिध्द होत असुन,दोषारोप क्र.२ सिध्द होत नसल्याचे आढळून आले.

प्रस्तुत चौकशी अहवालाच्या आधारे श्री. कास्टेवाड,जकात अधिक्षक यांचा दि. १४.११.२०१६ ते ७.३.२०१७ असा ११४ दिवसांचा निलंबन कालावधी हा निलंबन काळ म्हणुन गृहीत धरण्यात आलेला असुन कामात निष्काळजीपणा केल्याचा ठपका त्यांच्यावर दि.११.१०.२०१८ च्या आदेशान्वये ठेवण्यात आलेला आहे. सदर शिक्षेविरुध्द श्री. कास्टेवाड यांनी प्रस्तुत निलंबन कालावधी हा कर्तव्यकाळ म्हणुन गृहीत धरण्यात यावा व ठपका रद्द करण्याबाबत महानगरपालिकेच्या स्थायी समितीकडे दि. २०.१२.२०१८ रोजी अपिल दाखल केले होते.स्थायी समितीने श्री. कास्टेवाड यांचा निलंबन कालावधी हा कर्तव्यकाळ म्हणुन नियमित करण्याबाबत दि.३०.१.२०१९ रोजी ठराव क्र. १२७ संमत केला आहे.

३. श्री. कास्टेवाड,जकात अधिक्षक यांच्याविरुध्दचे दोषारोप अंशत: सिध्द झाल्यामुळे त्यांच्यावर किरकोळ स्वरुपाची शिक्षा बजावण्यात आलेली आहे. तसेच त्यांनी स्थायी समितीकडे विहित मुदतीत अपिल दाखल केलेले नाही. त्यांच्यावर बजावलेली शिक्षा ही किरकोळ स्वरुपाची असल्यामुळे ती रद्द किंवा त्यामध्ये बदल करता येणार नाही असा प्रशासकीय अहवाल महानगरपालिकेने स्थायी समितीच्या

निदर्शनास आणुन देण्याबाबत नगर सचिव, महानगरपालिका यांना दि. ४.२.२०१९ च्या पत्रान्वये कळविलेले. तथापि, स्थायी समितीने श्री.कास्टेवाड यांचा निलंबन कालावधी कर्तव्य कालावधी म्हणुन सदर ठराव क्र. १२७ दि. ३०.१.२०१९ संमत करुन नियमित केला. त्यामुळे महानगरपालिकेच्या स्थायी समितीने संमत केलेला उक्त ठराव क्र. १२७ दि. ३०.१.२०१९ हा महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियमातील तरतुदीनुसार विसंगत तसेच महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरुध्द असल्यामुळे सदर ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ४५१ (१) नुसार विखंडित करण्यासाठी शासन निर्णय दि.३०.८.२०१९ अन्वये निलंबित करण्यात आला.

**४.** सदर ठराव क्र. १२७ दि. ३०.१.२०१९ हा निलंबित करुन त्याबाबत अभिवेदन मागविण्यात आलेले होते. त्याअनुषंगाने श्री. कास्टेवाड , जकात अधिक्षक यांनी त्यांच्या दि. २०.९.२०१९ च्या निवेदनाद्वारे अभिवेदन शासनास सादर केले असून खालील मुददे नमूद केले आहेत.

१. कार्यालय अधिक्षक पदावर रूजू करून घेवून कनिष्ठ दर्जाचे कर निरिक्षक या पदावर काम देण्यात आले.

२. उप आयुक्त महानगरपालिका यांच्या स्वाक्षरीने निलंबित करण्यात आलेले आहे,जे की नियमबाह्य व अन्यायकारक आहे.

३. नोटबंदीच्या काळात बैठकीसाठी उपस्थित राहण्यासाठी कोणतेही पत्र देण्यात आले नाही.तसेच सार्वजनिक सुट्टीच्या काळातील दिनांक १२.११.२०१६ ते दिनांक १४.११.२०१६ ची अनुपस्थिती दाखविली आहे हे नियमबाह्य आहे.

४. काहीही न करता हजेरी पटावर स्वाक्षरीकरुन लिहुन गेले याबाबत मुख्यालयाकडे चौकक्षी न करता मुख्यालय सोडले असे म्हणणे चुकीचे आहे.

५. मा. सभापती स्थायी समिती यांनी प्राप्त अधिकारानुसार व नियमानुसार ठराव संमत केला आहे तो न्यायिक आहे.

**५.** श्री. कास्टेवाड,जकात अधिक्षक यांच्या उपरोक्त अभिवेदनासंदर्भात महानगरपालिका प्रशासनाने खालील प्रमाणे त्यांचे अभिप्राय सादर केले आहे.

अ) श्री.कास्टेवाड , वरिष्ठ लिपीक यांना अनुसुचीत जमाती या प्रवर्गामधुन जकात अधिक्षक या पदावर पदोन्नती देऊन त्यांना कार्यालय अधिक्षक , क्षेत्रीय कार्यालय - ०२. येथे पदस्थापना देण्यात आलेली आहे.

ब) महानगरपालिका अंतर्गत असलेली क्षेत्रीय कार्यालय क्र. १ ते ६ ही उप आयुक्त (महसूल ) यांच्या अधिनस्त असल्यामुळे संबंधितास मा. आयुक्त यांच्या मान्यतेने निलंबित करण्यात आले होते.

क) महानगरपालिका हद्दीतील महसूल गोळा करण्यासाठी नोटबंदीच्या काळात सुट्टीच्या दिवशी कार्यालय सुरु ठेवण्याबाबत आदेशाची प्रत व्हॉटस ॲप ग्रुप वर पाठविण्यात आली होती.

ड) नोटबंदीच्या काळात मालमत्ता व पाणि करापोटी रक्कमा भरासाठी माहे .नोव्हेंबर २०१६ मध्ये कर वसूलीची आणिबाणीची परिस्थिती असताना संबंधित हे कर्तव्याच्या ठिकाणी अनुपस्थित असल्याचे वरिष्ठांच्या निर्देशनास आल्यामुळे , वारिष्ठांनी त्यांची अनुपस्थिती ग्राह्य धरली आहे.

इ) स्थायी समितीने संमत केलेला ठराव नियमांशी विसंगत तसेच महानगरपालिकेच्या आर्थिक विका विरुद्ध असल्यामुळे सदर ठराव महानगरपालिका अधिनियम कलम ४५१ (१) मधील तरतूदीनुसार विखंडनासाठी शासनाकडे सादर केलेला आहे.

६. श्री. कास्टेवाड यांचे निवेदन व त्याबाबत महानगरपालिका प्रशासनाचे अभिप्राय याबाबत तपासणी करण्यात आली. यानुसार श्री. कास्टेवाड यांचे निवेदन अमान्य करून महानगरपालिकेच्या स्थायी समितीने संमत केलेला ठराव क्र. १२७ दि. ३०.१.२०१९ हा नियमानुसार नसून, महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरुध्द असल्यामुळे सदर ठराव उपरोक्त नियम ४५१(३) मध्ये नमूद केल्याप्रमाणे अंतिमत: विखंडीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

**उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केलेल्या वस्तुस्थितीनुसार “श्री. संभाजी माधवराव कास्टेवाड,जकात अधिक्षक, नांदेड वाघाळा महानगरपालिका यांचा दि.१४.११.२०१६ ते ७.३.२०१७ हा निलंबन कालावधी निलंबन काळ म्हणुन गृहीत धरण्याबाबत महानगरपालिकेच्या स्थायी समितीने संमत केलेला ठराव क्र.१२७ दि. ३०.१.२०१९ हा नियमाशी विसंगत तसेच महानगरपालिकेच्या आर्थिक हिताच्या विरुध्द असल्यामुळे, सदर ठराव महाराष्ट्र महानगरपालिका अधिनियम, १९४९ चे कलम ४५१ (३) नुसार अंतिमत: विखंडित करण्यात येत आहे.”**

सदरचा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०२२०१३११३३५४३६९२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Digitally signed by Vidya Ramappa Hampayya
Date: 2022.01.31 13:36:13 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) आयुक्त, नांदेड वाघाळा- शहर महानगरपालिका,नांदेड.
२) नगर सचिव तथा प्राधिकृत अधिकारी, नांदेड वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड.
३) मा. मंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव ,मंत्रालय,मुंबई-३२
४) प्रधान सचिव, (नवि-२), नगर विकास विभाग, यांचे स्वीय सहाय्यक
५) निवड नस्ती (नवि-२४) (२ प्रती).